**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय/अशासकीय महाविद्यालयांशी संबधित न्यायालयीन प्रकरणे हाताळण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१५/(प्रक. २९१/१५) मशि १**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १ जुलै, २०१५.

<u>वाचा</u> :- शासन परिपत्रक क्र. न्यायाप्र-२००९/प्र.क्र. २२०/०९/मशि-५ दिनांक ८.१०.२००९.

महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या मुळ अर्ज क्र. ३४०/२०११ व इतर प्रकरणांमध्ये मा. न्यायाधिकरणाने धोरणात्मक निर्णयाच्या संदर्भात योग्य स्तरावरून शपथपत्र दाखल केले जात नसल्याने निर्णय देण्यास मर्यादा पडत असल्याने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दिनांक २७.०४.२०१५ रोजी दिलेल्या न्याय निर्णयाव्दारे तीव्र नाराजी व्यक्त केली आहे. या पार्श्वभूमीवर यापुर्वी शासन परिपत्रक क्र. न्यायाप्र-२००९/प्र.क्र. २२०/०९/मशि-५ दिनांक ८.१०.२००९ अन्वये दिलेल्या सूचनांचे पुनर्विलोकन करून पुढीलप्रमाणे सुधारित सूचना देण्यात येत आहेत :-

१. शासनाच्यावतीने शपथपत्र दाखल करण्यासाठी प्राधिकृत करण्यात आलेल्या प्राधिकरणाने कोणत्याही परिस्थितीत संबंधित प्रकरणी शपथपत्र दाखल करण्यासाठी अन्य प्राधिकरणास प्राधिकृत करण्यात येऊ नये.

२. उच्च न्यायालयाच्या खंडपीठांसमोर अथवा महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या खंडपीठांसमोर दाखल होणाऱ्या न्यायालयीन प्रकरणात बरीचशी प्रकरणे ही धोरणात्मक निर्णयातील तरतूदींच्या अंमलबजावणी संदर्भात दाखल होतात. अशा प्रकरणी धोरणात्मक निर्णयास आव्हान देण्यात आले असल्यास अशी प्रकरणे शासन स्तरावर सादर करण्यात यावे.

३. प्रस्थापित धोरणाच्या अंमलबजावणीच्या संदर्भात वेगवेगळया खंडपीठांसमोर न्यायालयीन प्रकरणे दाखल झाली असल्यास अशा प्रकरणी शासनाच्या भूमिकेमध्ये एकवाक्यता असणे आवश्यक आहे. तसेच अशा प्रकरणांमध्ये एखादया खंडपीठासमोर निर्णय झाला असल्यास सदर निर्णयाचा किंवा सदर निर्णयात उपस्थित करण्यात आलेल्या मुद्दांचाही विचार दुसऱ्या खंडपीठात दाखल झालेल्या न्यायालयीन प्रकरणी विचारात घेणे आवश्यक आहे. यास्तव अशा प्रकरणी संचालनालयाच्या स्तरावरून परिच्छेदनिहाय अभिप्रायास मान्यता देऊन

संबंधित सहसंचालकांना शपथपत्र दाखल करण्यासाठी प्राधिकृत करण्यात यावे. कोणत्याही परिस्थितीत प्राचार्यांना शपथपत्र दाखल करण्यास प्राधिकृत करण्यात येऊ नये.

४. संबंधित न्यायालयीन प्रकरणी शपथपत्र दाखल झाल्यानंतर सुनावणी दरम्यान पाठपुरावा करणे व वेळोवेळी उपस्थित होणाऱ्या मुद्दांच्या अनुषंगाने शासकीय अभियोक्ता/सादरकर्ता अधिकारी यांना माहिती उपलब्ध करून देण्यासाठी आवश्यकतेनुसार शासन अथवा संचालनालयाकडे दूरध्वनी/ई-मेल यासारख्या माध्यमाव्दारे तात्काळ संपर्क साधून वेळीच पुर्तता करण्याची जबाबदारी संबंधित सहसंचालकांची राहील.

५. मा. उच्च न्यायालये/ प्रशासकिय न्यायाधिकरणे यांनी दिलेल्या निर्णयांमध्ये अनेकवेळा अंमलबजावणीसाठी कमी वेळ दिलेला असतो. तसेच काही प्रकरणी असेही निदर्शनास आले आहे की, न्यायानिर्णयाविरुध्द अपिल/पुनर्विलकोन याचिका दाखल करण्यासाठी न्यायनिर्णयात विहीत केलेल्या कालावधी उलटुन गेल्यानंतर किंवा सदर कालावधी संपण्याच्या आसपास संचालनालयाकडून शासनास प्रस्ताव प्राप्त होत असतात. अशा प्रकरणी निर्णय घेण्यास पुरेसा अवधी हातात रहात नसल्याने नाईलाजास्तव न्यायनिर्णयांची अमंलबजापणी करावी लागण्याची स्थिती निर्माण होते. यास्तव अशा प्रकरणी मा. उच्च न्यायालये/ प्रशासकिय न्यायाधिकरणे यांच्याकडून देण्यात येणाऱ्या निर्णयांच्या प्रती मा. उच्च न्यायालये/ प्रशासकिय न्यायाधिकरणे यांच्या प्रंबधक कार्यालयांकडून प्राप्त होण्याची प्रतिक्षा न करता सदर न्यायनिर्णयांच्या प्रती लवकरात लवकर प्राप्त करून घेण्याची जबाबदारी संबधित सहसंचालकांची राहील.

६. मा. उच्च न्यायालय/मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांच्या खंडपीठांनी दिलेल्या न्यायनिर्णयाच्या संदर्भात संबंधित न्यायालयाने विहित केलेल्या कालमर्यादेत सदर निर्णयाची अंमलबजावणी होणे किंवा त्याविरूध्द पुनर्विलोकन याचिका/अपील याचिका दाखल होणे आवश्यक आहे. यास्तव ज्याप्रकरणी अंमलबजावणी करावयाची आहे अशा प्रकरणी अंमलबजावणीच्या कारणमीमांसेसह व सदर अंमलबजावणीमुळे होणाऱ्या संभाव्य आर्थिक व प्रशासकीय परिणामांच्या तपशीलासह आवश्यकतेनुसार प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण यांना किंवा संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत शासनास सादर करण्याची जबाबदारी संबंधित सहसंचालकांची राहील.

७. ज्या न्यायालयीन निर्णयांविरूध्द पुनर्विलोकन याचिका/अपील याचिका दाखल होणे आवश्यक आहे, अशा प्रकरणी संबंधित शासकीय अभियोक्ता/सादरकर्ता अधिकारी यांचे अभिप्राय तसेच पुनर्विलोकन याचिका/अपील याचिका दाखल करण्यासाठी न्याय निर्णयात उपस्थित करण्यात आलेल्या मुद्यांशिवाय इतर नवीन मुद्दे तसेच न्याय निर्णय उल्लेख करण्यात आलेल्या मुद्यांच्या उहापोहासह स्वयंस्पष्ट अभिप्राय व मुळ अर्ज/ याचिकेची प्रत व त्याअनुषंगाने शासनाच्या वतीने दाखल करण्यात आलेल्या शपथपत्राच्या प्रतीसह परिपुर्ण

प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत शासनास सादर करण्याची जबाबदारी संबंधित सहसंचालकांची राहील.

८. वरील ५ व ६ मध्ये उल्लेख करण्यात आलेले प्रस्ताव संबंधितांकडे पाठविताना प्रस्तुत प्रकरणी निर्णय घेण्यास सक्षम असलेल्या प्राधिकरणास मा. उच्च न्यायालय/महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांनी विहित केलेल्या कालमर्यादेत निर्णय घेण्यास पुरेसा कालावधी उपलब्ध राहील याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित सहसंचालक तसेच संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

९. कालमर्यादेअभावी अथवा योग्य पाठपुराव्याअभावी विहित कालमर्यादेत न्यायालयीन आदेशांच्या अनुषंगाने अंमलबजावणी अथवा पुनर्विलोकन याचिका/अपील याचिका दाखल करण्यासंदर्भात कार्यवाही न झाल्याने अवमान याचिका दाखल झाल्यास संबंधित सहसंचालकांविरूध्द जबाबदारी निश्चित करून त्यांच्याविरूध्द विभागीय चौकशीचा प्रस्ताव सादर करण्याची जबाबदारी संचालकांची राहील. तसेच अशा प्रकरणी शासनावर अनावश्यक आर्थिक भार पडत असल्यास/पडणार असल्यास सदरची वसूली संबंधित सहसंचालकांकडून करण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०११२९४३५६०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Niwrutti B Marale

Digitally signed by Niwrutti B Marale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Niwrutti B Marale
Date: 2015.07.01 11:32:25 +05'30'

(नि. भा. मराळे)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण

३. मुख्य शासकीय अभियोक्ता, मा. उच्च न्यायालय खंडपीठ, मुंबई/नागपूर/औरंगाबाद

४. सादरकर्ता अधिकारी, मा. महाराष्ट्र प्रशा सकीय न्यायाधिकरण, खंडपीठ, मुंबई/नागपूर/ औरंगाबाद

मशि-२, ३, ४, ५, ६ कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई./ निवडनस्ती/मशि-१